# श्रीचिदम्बरः शरणम्

## चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना

तृतीयावृत्तीचे मुद्रण ७३ साली झाले. त्याकरिता डॉ. एस्. आर्. देशपांडे यांनी फारच परिश्रम घेतले. द्वितीयावृत्तीत असलेल्या त्रुटी दूर करून काही उपयुक्त विषय जोडले. अध्यायाच्या प्रारंभाला अध्यायार्थाची कल्पना येईल अशा पध्दतीने उपयुक्त चित्रयोजना केली.

द्वितीयावृत्तीची प्रस्तावना वाचनीय व मननीय असल्यामुळे या आवृत्तीत तिचा समावेश केला आहे. तृतीयावृत्तीची प्रस्तावना मननीय असून, प्रायः पुष्कळ विषयांचा समावेश द्वितीयावृत्तीच्या प्रस्तावनेत होण्यासारखा आहे म्हणून पुनः मुद्रित केलेला नाही.

तृतीयावृत्तीत सप्तग्रामांचा परिचय दिला आहे. महास्वामींचे द्वितीयपुत्र श्रीशंकरदीक्षित हे महास्वामींच्या इच्छेनुसार बडली गावी राहिले. त्या गावाबद्दल काही महत्वाचे विषय या आवृत्तीत अधिक घातले आहेत. "सप्तग्रामाः" या स्थानी "अष्टौग्रामाः" केले आहेत.

मागील आवृत्तीत "चत्वारो भक्ताः" या सदराखाली प्रत्येक भक्तांचा संक्षिप्त परिचय व वाङ्मय दिले आहे. उदाहरणार्थ श्रीशिवशास्त्री यांचा परिचय देऊन त्यांनी रचलेले भक्तानन्दस्तोत्र संपूर्ण दिले आहे. परंतु भक्तानन्द स्तोत्र वगैरे वाङ्मय कानडी, देवनागरी लिपीत स्वतन्त्रपणे मुद्रित झाले आहे. म्हणून या आवृत्तीत घातले नाही. चार समकालीन भक्तांशिवाय अलीकडे झालेले दोन

भक्त श्रीशेषाचलसद्गुरु आनंदवन (अगडी) व श्रीकैवल्याश्रम स्वामी (श्री बोटे स्वामी) मुनवल्ली यांचा परिचय थोडक्यात दिला आहे. त्यामुळे श्रीचिदम्बरकृपावैभवाची कल्पना येईल.

गुरुपरंपरेत श्रीचिदम्बरमहास्वामी पुर्णानन्द, श्रीमार्तंडदीक्षित अमृतेशानन्द, श्रीस्वयंप्रकाशानन्द या तिघांचा उल्लेख केला आहे. संपूर्ण गुरुपरंपरा अन्यत्र पहावी.

महास्वामींच्या भक्तांच्या इच्छेप्रमाणे मुद्रणकार्य हाती घेतले. त्यासाठी काही द्रव्य कर्जरुपाने काही द्रव्य भक्तांच्या मुद्रणपूर्व संचयाने कामास लागले.

या कामास श्रीमार्तंड चिदंबरदीक्षित, न्यायमीमांसाविद्वान चिदंबरनिवास, विद्यानगर, हुबळी. यांचे प्रोत्साहन मुख्य असून, पुनर्मुद्रणाच्या कामात त्यांचे व डॉ. एस्. आर्. देशपांडे यांचे सहकार्य अविस्मरणीय आहे. मुद्रणकार्यासाठी समितीच्या सदस्यांनी सर्वरीतीने सहकार्य दिले व काही मुद्रणपूर्व द्रव्यसहाय्य मिळवून दिले. त्यांना सादर आभिनंदन समर्पित आहे.

ग्रंथाचे मुद्रण अत्यंत सुबकपणे करून सर्वांगसुंदर करण्याचे कामी एलिगंट ऑफसेट प्रिंटर्स, बेळगांव यांनी विषेश लक्ष घातले त्याबद्दल त्यांचे साभार अभिनंदन.

**श्रीचिदम्बरसेवासमिति**

**मदिहाळ, धारवाड.**

श्री चिदंबर शक २३१

दि. १८-नोव्हेंबर १९८९

# प्रस्तावना द्वितीयावृत्तीची

– ॐ तत्सत् –

॥ श्रीचिदम्बरमहागुरवे नमः ॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽत्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

श्रीमद्भगवद्गीता.अ.४.७-८

भाग्यवती आपली भारतभूमि, जिथें अनेक संत, महंत, ऋषि, मुनि, साधुसत्पुरुष व अखिल विश्वांत खळबळ उडवून देणारे महान् युगपुरुष निर्माण झाले. धन्य आपला भारत देश, जो अखिल जगताचा आध्यात्मिक मेरुदंड होय! खरोखरीच आपली भारतमाता ही योगशास्त्राचें गव्हर, पावित्र्याचें मंदिर, ज्ञानाचा सागर, भक्तीचें माहेर, निजधनाचें भांडार व आनंदाचे आगर आहे. म्हणूनच म्हटले आहे–

"भरतखंडीं नरदेह प्राप्ती ॥ हे निजभाग्याची संपत्ती ॥
जेथें अनंत अवतारांची उत्पत्ती ॥ धर्मस्थापनेस्तव" ॥

अशाच एका दिव्य अवतारशार्दूलाचें मंगल चरित्र तपस्वी श्रीसांबदीक्षित काशीकर नांवाच्या एका भक्तानें उत्स्फूर्त रचिलें आहे. अज्ञानांधकारांत खितपत पडलेल्या जगाला आत्मज्योतीचें दिव्य दर्शन देऊन परमोच्च परमार्थपथ प्रकट करून सायुज्यपदाप्रत नेण्यास समर्थ अशा अवतारी पुरुषांचें जीवन कैक वेळां कारणीभूत झालें आहे.

श्रीचिदम्बरमहास्वामींच्या उत्कट उपासकांना परम–पवित्र असलेल्या मूळ ग्रंथाच्या



प्रस्तावना

पुनर्दर्शनाचा लाभ, मनोहर मुद्रण व शोभिवंत अशा स्वरूपात श्रीचिदम्बरमहास्वामींच्याच कृपेनें होत आहे, ही अत्यंत आनंदाची व अभिमानाची गोष्ट होय.

सनातन धर्माच्या चिरंतन अमर तत्त्वांच्या झगझगीत प्रकाशाचा लखलखाट करून, रंजल्या—गांजल्या जगात नवचैतन्य ओतून, आपल्या उक्तीनें व कृतीनें अभूतपूर्व अशा अनेक लीला प्रकट करून श्रीचिदम्बरमहास्वामींनी पूर्णावताराची पुरेपूर साक्ष सर्वत्रांना पटविली. नितांत नीतिमत्ता, अपूर्व चारित्र्य, अगाध लीला, उदात्त उपदेश, प्रेमपूर्ण अंतःकरण, समत्वदृष्टीचे विविध स्फूर्तिदायक संपर्क, वैदिक परंपरेस मान्य पण तीक्ष्ण तर्कास ग्राह्य असे वैशिष्ट्यपूर्ण आणि ईश्वरी संकेताच्या पूर्ततेकरिता अनंत मार्गांनीं वाहणारें व श्रेष्ठ सद्‌गुणांच्या सुंदर समुच्चयांनीं नटलेलें संपन्न जीवन म्हणजेच सुमारे दोनशे वर्षांपूर्वी श्रीचिदम्बर महास्वामींच्या रूपांत झालेला जगन्नियंत्या परमेश्वराचा परिपूर्ण अवतार होय. या विधानास पुष्टि देणारे अस्सल ऐतिहासिक पुरावे आजतागायत उपलब्ध आहेत. ज्या ज्या वेळीं जगतीतलावर, दैवी संपत्तीचा ऱ्हास होऊन आसुरी संपत्ति बळावते, नीतीचा नायनाट होऊन अनीति बोकाळते, सुष्टांचा छळ होऊन दुष्टांचें प्राबल्य वाढतें, सध्दर्मास ग्लानि येऊन अधर्म माजतो, त्या त्या वेळीं सुष्टांचें संरक्षण व दुष्टांचें निर्दालन करून सध्दर्माच्या संस्थापनेसाठीं मीं अवतार धारण करतों ही भगवंताची सत्योक्ति सर्वश्रुत आहेच व तीच त्याही वेळीं खरी ठरली.

जमखंडीजवळच्या गोठे ग्रामांतील जोशी घराण्यांत मल्हारभट्ट नांवाचे एक श्रेष्ठ तपस्वी व महानुभावी इ. स. १७०५ सालीं जन्मास

आले. कुमारवयापासूनच मल्हार दीक्षितांना असलेला प्रपंचाबद्दलचा तिटकारा, त्यांतच त्यांचे वयाचे सोळावें वर्षी घडलेलें गुरुस्थानीं असलेल्या वडिलांचें देहावसान व तज्जन्य कौटुंबिक जबाबदारी, गोठे ग्रामीं पाठशालादि शिक्षण सोयींचा अभाव, ज्योतिर्वृत्तीविषयी असलेला जन्मजात अनादर, धर्मशास्त्रविद्याभ्यासाची उत्कट आतुरता व पारमार्थिक जीवनाविषयीं आत्यंतिक तळमळ यामुळें काशीक्षेत्रीं जाऊन, स्वयंप्रकाश गुरूंजवळ सतत वीस वर्षे विद्यार्जन करून ते सकलशास्त्रांमध्ये पारंगत झाले. श्रीसखाराम त्र्यंबक ऊर्फ अप्पूनाना गर्दे 'श्रीमच्चरित्रामध्यें' लिहितात—

"स्वयंप्रकाशनामें थोर यति । शरण त्याप्रति मल्हारी तो ।।१।। तर्क व्याकरण मीमांसा वेदांत । ज्योतिष सिध्दांत पातंजल ।।२।। धर्मशास्त्र सांख्य मंत्रावलोकन । तांत्रिक शोधन उपासना ।।३।। लयलक्षमुद्रा ज्ञान ध्यान योग । आर्य राजयोग मना आणी ।।४।। श्रौत सर्व सांग शास्त्र ते छांदस । साहित्य अभ्यास पूर्ण वसे ।।५।। भूतमात्रीं दया धर्माचें स्थापन । अखंडैकज्ञान हृदीं वसे" ।।६।।

मल्हार दीक्षितांनी रचलेला व आजमितीस प्रचारांत असलेला "षोडशसोमयाजी प्रयोग" त्यांच्या अगाध विद्वत्तेची व सकलशास्त्रनैपुण्याची साक्ष पटवीत नाहीं काय?

'गृहस्थाश्रमांत राहून प्रेम व त्याग यांच्या हरघडीं आचरणानें मानवी अंतःकरण मार्दव पावून जनांगाच्या सुखदुःखाशीं समरस होण्यास अवकाश मिळतो. करितां तूं गृहस्थाश्रम स्वीकारून जनकल्याण व आत्मकल्याण साधून घे' या स्वयंप्रकाश गुरूच्या श्रेष्ठ आदेशानुसार मल्हारभट्ट गोठ्यास परतले. त्या छोट्याशा

ग्रामी त्यांच्या प्रगाढ विद्वत्तेला व अचाट कर्तृत्वशक्तीला पुरेसा वाव मिळेल असें न वाटल्यानें त्यांनीं मुरगोड म्हणजेच पुराणप्रसिध्द 'अमरकल्याण' ग्रामीं द्वितीय भार्येसह येऊन वास्तव्य केलें. तेथें त्यांनीं 'शहाणे करून सोडावे सकल जन' यादृष्टीनें संस्कृत पाठशाला उघडून धर्म व नीतिशिक्षण देण्यास प्रारंभ केला. लवकरच त्यांची द्वितीय पत्नी पण निवर्तली. अशा नाजूक प्रसंगीं गुरूंच्या आदेशाची आठवण झाल्यामुळें त्यांनीं बेडसुरचे जक्कनगौडा यांची सुलक्षणी कन्या लक्ष्मीदेवी इच्याशीं तृतीय विवाह केला व आपलें धर्मशिक्षणकार्य अव्याहतपणें चालू ठेवलें.

आणि या वेळीं तर कलीचा प्रादुर्भाव विपरीत वाढला होता तें संतोक्तींतच पाहा–

"हे ओखटे दिन आले बहुताप्रकारीं ।
थोरावला कलि तधीं बहु मत्त भारी ।।१।।
कलिराज हा दुर्धर केले विषय लोभ अपार।।
शब्दज्ञान घरोघर सत्यभक्ति लोपली ।।२।।

राजाराम

"धर्मग्लानी झाली पाहुनि हानी मनीं जनीं–
यास्तव येवुनि पोटा लावी जग धर्मे सेतुचें वाटे ।।

गर्दे

आणि म्हणूनच पाखांडपणाचें बंड मोडून, भक्तिज्ञानाचा डांगोरा पिटून, शांतिसुखाचा सुकाळ करणारा सत्पुत्र आपल्या पोटीं अवतारावा या हेतूनें त्यांनीं प्रथम सुगोल क्षेत्रीं जाऊन सोमनाथाच्या सन्निध सहामात वर्षे गायत्रीपुरश्चरण केलें. तदनंतर हिप्परगी क्षेत्रीं प्रयाण करून, आपलें कुलदैवत मार्तंड भैरव याची दोन वर्षे कडक आराधना केली त्या वेळीं–मार्तंडेश्वर आज्ञा करी ऐसी ।। तुम्ही जावें चिदंबर क्षेत्रासी ।।

चिदंबर प्रसन्न होऊन तुम्हासी ।। अवतरे निश्चयें तुमच्या कुशीं ।।

अध्याय १९, ओवी १३
राजारामकृत—निजात्मबोध

असा त्यांना दृष्टान्त झाला.

या दृष्टान्तानुसार आकाशचिदंबर क्षेत्रीं जाऊन त्यांनीं सतत तीन वर्षे घोर तपश्चर्या आचरून भगवान शंकरास प्रसन्न करून घेतले. त्या वेळीं भगवान महादेव कोटि सूर्याच्या दिव्य प्रकाशांत प्रकट होऊन त्यांनीं—

मी तुम्हासी झालों प्रसन्न ।। ऐसें दिधलें अभयदान ।।
तुमच्या उदरीं अवतार धरून ।। जगदुध्दारण करीन मी ।।

अ. १९ ओ. ३९
राजारामकृत, निजात्मबोध

असा इष्टवर दिला, आणि त्याबरहुकूम शके १६८० बहुधान्य संवत्सर, कार्तिक वद्य ६ सोमवार, या शुभदिनीं सर्व ग्रह उच्चस्थानीं असतांना पूर्णब्रम्ह, श्रीचिदंबरस्वामींच्या रूपानें अवनितलावर अवतरलें.

या अवताराविषयीं संतभक्तादिकांचा उल्लेख पहा—

सत्यं त्वमेवरजताचलनायकोऽसि ।
सत्यं त्वमेव वृषभे- श्वरवाहनोऽसि ।
सत्यं त्वमेव गिरिराजसुताधवोऽसि ।
सत्यं शिवोऽसि धृतमानुषवेष सत्यम् ।।
बभूव भूमौ परमेश्वरोऽसौ । चिदम्बराख्यः स शिवोऽवतीर्णः ।
यस्य प्रभावो निगमैरगम्यो । यन्मायया मुह्यति एव लोकः ।। शिवशास्त्रिणः.

सगुणब्रम्ह चिदम्बर । जो अंतरसाक्षी ईश्वर।
लीला दावी अनंत अपार । पूर्णावतार स्वामी माझा ।। दास राजाराम.

चैतन्यरूप प्रगटे समजा अहो ते ।।
सखाराम गर्दे.

या परिपूर्ण अवताराच्या जीवनांतील विविध व अगाध स्रोतांचे यथार्थ वर्णन करणें हें मर्त्यमतीस अशक्यप्राय आहे. आक्षेपरहित अशा ऐतिहासिक सत्यास उतरलेल्या या चरित्रग्रंथाच्या वाचनाने निस्सीम चिदम्बर भक्तांना अखंड आत्मकल्याणाचा अनुपम मार्ग मिळणार आहे. यापुढें श्रीचिदम्बरमहास्वामींच्या, सहस्त्र - पैलू जीवनप्रकाशाच्या कांहीं किरणांचे यथातथ्य दर्शन, केवळ व्यावहारिक दृष्टीनें, साधकवृंदास करवून देण्याचा आमचा मानस आहे.

बालवयापासूनच चिदंबरमहास्वामींचा दैवी प्रभाव प्रकट झाल्याशिवाय राहिला नाहीं. एकदा त्यांच्या प्रेमळ मातेनें कवळ घालण्याकरितां लडिवाळपणें बळेंच बाळाचें तोंड उघडले त्यावेळीं चिदंबराच्या चिमुकल्या मुखांत विराट् विश्वाचें दिव्य दर्शन तिला लाभलें.

यथाकालीं मल्हार दीक्षितांनीं सुमुहूर्तावर श्रीगणेश व श्रीसरस्वती यांची पूजा करून अक्षरारंभ केल्यादिवशींच बावन्न अक्षरे, बाराखड्या वेदांत, शिक्षा शिकून श्रीचिदम्बरानी वडीलांना संतोष दिला. एकागहिन्यातच सर्व षडंग संपविले. पांचव्या वर्षी मौजीबंधनानंतर एका संवत्सरांतच त्यांनीं चतुर्वेद, मंत्र, ब्राम्हण, पद, क्रम, जटा, घन, षट्शास्त्रें, अष्टादश पुराणें, सूत्रें, भाष्य, याज्ञिक, बीज, न्यास, रहस्यकृति, वगैरे चौदा विद्या संपूर्ण केल्या. ही अलौकिक मेधा पाहून सर्व विद्वानांनीं आपल्या माथा तुकविल्या.

श्रीचिदंबरांचे ठायीं अतुल आणि अपूर्व पितृभक्ति वसत होती. पितृभक्तीचा पाठ जगाला देण्यासाठीं त्यांनीं अहर्निश, अनुपम

पितृसेवा आचरली. ब्राम्हमुहूर्ती पित्याचे अगोदर उठावें, सडासंमार्जन सारून पूजेची सामग्री मांडून त्यांना उठवावे, खांद्यावरून पूजेचें पाणी वाहावें, आणि पित्याच्या हांकेबरोबर धांवत येऊन अदबीनें पित्राज्ञा पाळावी, वडील झोंपी गेल्यानंतरच झोंपावें, याप्रमाणें त्यांनीं अनन्यभावें सद्‌गुरुस्वरूप पित्याची सेंवा केली. पिता–पुत्राचा हा अभूतपूर्व संयोग सर्वत्रांस उद्बोधक होता. पूज्य लक्ष्मी मातेचें प्राणोत्क्रमण झालें त्या समयीं तिचें प्राण परत आणणेची आपली मनीषा त्यांनीं वडिलांना दर्शविली. पण त्यांचा "त्वां आतांच प्रगट होऊं नये" असा आदेश होतांक्षणीं त्यांनीं तिचा और्ध्वदैहिक विधि संपविला.

पित्राज्ञा प्रमाण मानून श्रीचिदंबरांनीं भगवती सरस्वती व साध्वी सावित्री या दोघींचें पाणिग्रहण केलें. भूकैलास शोभणाऱ्या त्यांचे मंदिरांत अध्यात्मत्वाचा अखंड आमोद ओंसंडत होता. त्यांना तेजःपुंज व सद्‌गुणसंपन्न अशीं सहा पुत्ररत्नें झालीं. कार्यकुशल दिवाकर, वेदशास्त्रपारंगत शंकर, तपोदक्ष मृत्युंजय, देवाद्विजभक्त वररुचि, सत्कर्मशील काशीनाथ, सेवासक्त भास्कर, या सर्वांवर श्रीचिदंबरमहास्वामीचें दिव्य प्रेम होतें, व तद्वतच त्यांचेवर मुलांचीहि निस्सीम भक्ति होती. पितृनिष्ठ पुत्र, प्रेमळपति् व परमपूज्य पिता असें श्रीचिदंबरमहास्वामीचे कौटुंबिक जीवन विश्वाला आदर्शभूत ठरले.

प्रपंच व परमार्थ यांचा मिलाफ करून आत्मोध्दार व लोकोध्दार सहज कसा साधता येईल याचें तें जाज्वल्य प्रतीकच होतें.

श्रीचिदंबरांच्या वेळीं भोंवतालच्या भीकर परिस्थितीनें धनिकवर्ग व सत्ताधीश यांचीहि मनोवृत्ति भयभीत झाली होती. दारुण दुष्काळ

थैमान घालीत होता. पाण्याच्या दुर्भिक्षतेमुळें तर लोकांच्या तोंडचें पाणीच पळालें होते. अश्या विपत्काळी श्रीचिदम्बरांचा अवतार झाल्याने समाजाच्या जीवनात नवचैतन्य संचारूं लागलें. त्यांच्या ओजस्वी प्रभावानें खचलेल्या समाजास खंबीर केलें. श्रीचिदंम्बमहास्वामींनी निर्जल प्रदेश सजल केले आणि मल्लनगौडासारख्या धनिकांचीं कोठारें मुक्तद्वार ठेवून क्षुधेनें व्याकुळ झालेल्या जनतेला संतृप्त केलें. दुष्काळाच्या दुर्धर दिवसांत लाखो दीन जनांना यथेच्छ अन्नसंतर्पण करण्यास्तव तसेंच वरुण देवास प्रसन्न करण्यासाठी म्हणून त्यांनीं एक महान् यज्ञ केला. त्यानंतर भूमि खरोखरच सुजला व सुफला झाली.

'राव रंक याती समान । अणुरेणु जीव प्राण'

या त्यांच्या शिकवणीनें समाजात संजीवनी ओतली गेली व उच्च—नीच भाव पार विरून जाऊन समता, ऐक्य आणि प्रेम नांदूं लागलें. घरोघर वेदघोष होऊं लागला आणि सर्व जनतेला सन्मार्ग प्रवृत्त करून त्यांना त्यांनी आपल्या पवित्र कार्याच्या मंगल मालिकेंत ओवून टाकले. सनातन धर्माच्या शुध्द, शाश्वत व उज्वल पीठावरून समदृष्टीचे पारमार्थिक पाठ लीलेने जगास शिकविले.

चमत्कार हे साध्य नसून मानवी अंतःकरणांतील दैवी स्फुलिंगाला जागृत करणेस व परमार्थ पथाप्रत नेण्यास वेगचक्राप्रमाणें साधन म्हणून त्यांचा उपयोग होतो. अल्पमति मानवाला चकित करणारे चमत्कार हे विश्व निर्माण करणाऱ्या कर्तुं—अकर्तुं अशा परमात्मशक्तीला कांहींच नव्हतें. पूर्वजन्माचें वृत्त सांगून त्यांच्या खाणा खुणा पटवून देणें, शेंपांचशें लोकांच्या अन्नावर पांचपन्नास हजारांना यथेच्छ जेवूं घालणें, क्षयसारख्या असाध्य

रोगांपासून मुक्त करणें, चौवर्षाच्या बालका–करवीं चारी वेद म्हणविणें, मंत्रशक्तीनें मृद्गज चालविणें, विधवेला तिचें सौभाग्य पुन: प्राप्त करून देणें, अशा एक ना दोन, हजारो लीलांनीं चिदंबर महास्वामीचें जीवन भरून गेलें आहे. किंबहुना श्रीचिदंबर महास्वामींचें जीवन म्हणजे अनंत व अगाध अशा लीलांचे आगरच होय. ऐंडीगेरी गांवाच्या साध्वी नरसूबाई नांवाच्या एका विधवेला श्रीचिदंबरस्वामींनीं सौभाग्यदान दिलेलें आहे. आणि तिचे व तद्वतच स्वामीकृपेस पात्र झालेल्या अशा अनेक भक्तांचे, अद्यापिही श्रीमहास्वामींच्या श्रीक्षेत्र मुरगोड व गुर्लहोसुर येथील उत्सवास पिढ्यान् पिढ्यांपासून दर वर्षी बिनचूक हजर राहून आपली भक्ति सादर समर्पण करणारे अनुवंशज हे श्रीस्वामींनीं वेळोवेळीं प्रकट केलेल्या दिव्य लीलांचे जिवंत व जाज्वल्य पुरावेच आहेत.

सुप्रसिध्द इतिहास–संशोधक श्रीयुत वासुदेवशास्त्री खरे यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १४ पान ७५२३ वर पत्र. क्र. ६४३६ मध्येंहि याबद्दल उल्लेख आहे तो असा–

"आम्ही गुदस्ता मिरजमळा संस्थानांतील १८०२–१८०६ पर्यंतची चिटणिशी दप्तरें चाळलीं, त्यामधून मुलें होणें, हस्तस्पर्शाने रोग बरे करणें, पांचशें माणसांच्या शिध्यांत पांच हजार माणसांना भरपूर जेवावयास घालणें, नवीन जिन्नस उत्पन्न करणें, दुसऱ्यांच्या मनांतील ओळखणें, वगैरे बाबांनीं केलेलें अनेक दैवी चमत्कार आम्हास वाचावयास सांपडले." श्रीचिदंबर पत्रोत्तरांत राजे व सरदार वगैरेंनाहि उपदेश करीत असत.

"तुम्हीं नीतीनें चालावें, सत्यशील व्हावें, म्हणजेच माझे आशीर्वाद तुम्हाला फलतील" असा त्यांच्या अमूल्य आदेश आहे. या त्यांचा

आदेशामुळें सरदार व राजे यांच्या नीतिमत्तेंत जें परिवर्तन घडलें त्याचा प्रभावी परिणाम सामान्य जनतेवरहि झाल्यावाचून राहिला नाहीं.

श्रीचिदंबर महास्वामींच्या प्रभावपूर्ण कक्षेंत, तत्कालीन अनेक थोर व्यक्ति आल्या होत. आसेतुहिमाचल सर्व जातींचे, धर्माचे व भाषांचे लोक त्यांचे दास बनले होते.

"पटवर्धन, गोखले, रास्ते व कर्नाटकांतील मोठमोठे जमीनदार हे सर्व त्यांचे निःसीम भक्त बनले." खरे ऐ. ले. सं. भाग १४ पत्र क्र. ६४३६.

याशिवाय पेशवे, परचुरे, पानसे, फडके, मुजुमदार, विंचूरकर, लागू, बिळगीचा सोमशेखर राजा, कित्तूर, रुद्रापूर, शिरसंगी, नाल्वत्तवाड, भेंडिवाड, गोठे वगैरे ठिकाणचे देसाई, धारवाडचे देशपांडे, करडीगुद्दी इनामदार, म्हैसूरचा दिवाण पूर्णय्या इत्यादि अनेक थोर लोकांचा त्यांच्याशीं घनिष्ठ संबंध आला होता, हें विद्यमान कागदपत्रावरून दिसून येतें. सावनूर येथें आजमितीसहि शोभत असलेले श्रीमहास्वामींचें मंदिर हें त्यांच्या असामान्य प्रभावाची व लोकोत्तर कर्तृत्वशक्तीची साक्ष पटवीत नाहीं काय?

सरदारांसरदारांमध्यें अंतःकलह व बेकी यांचा बुजबुजाट झाल्यावेळीं श्रीस्वामींनी त्यांच्यांतील तेढ मोडून काढून सलोखा निर्माण केल्याचें, हरीपंतबाबांनीं रामचंद्रपंत आप्पांस लिहिलेलें असें खालील पत्र हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

"पुढें आम्हावीशीं वाकडी गोष्ट कदापि घडू नये आणि घडणार नाहीं. येविशीं उभयपक्षीं खातारजमा व्हावी ती श्रीदीक्षितबाबांचे विद्यमाने व्हावी"......

"श्रीचि आज्ञा गोखले याजकडील ब्राम्हण पत्र घेऊन आला होता त्याजपाशी आज्ञा झाली कीं

उभयतांनीं कलह करू नये. अम्हापाशी येऊन उभयपक्षीं सौरस्य व्हावे असा निरोप :- खरे, ऐ. ले. सं. भाग १३, पत्र क्र. ६३२४.

श्रीचिदंबर महास्वामींनी दिलेला प्रसाद व फलमंत्राक्षता यांचा अनादर करून गेल्यामुळें अनेक अनिष्ट प्रकार घडल्याची साक्ष कागदपत्रांवरून पटते.

"टिपूस आपल्या दुष्कर्माबद्दल पश्चात्ताप झाला आहे. आपणांस भेटावयास तो घाबरतो. आपण द्याल ती शिक्षा भोगावयास तो तयार आहे" अशा आशयाचे शृंगेरी मठाधीशांचें महास्वामींच्या नांवचें मुद्रांकित पत्र उपलब्ध आहे. राजवडे संशोधन मंडळग्रंथ १० खंड २५ यांतही राजे व सरदार यांशीं संबंधित अनेक गोष्टींचा उल्लेख आहे.

हरीपंतदादा फडके यांच्या पोटशुळावर महास्वामींनीं सुचविलेलें राजकीय अनुष्ठान खरोखरच अपूर्व असून उद्‌बोधक आहे.

खरे ऐ. ले. सं. पत्र नं. ३५०७

केव्हा सल्ला देऊन, तर केव्हा आशीर्वाद पाठवून, केव्हा ऐन चणचणींत आर्थिक साहाय्य मुक्तहस्तें देऊन, तर केव्हा आपल्या योगसामर्थ्याच्या प्रभावानें हरप्रकारें सहाय्य करून, केव्हा केवळ निरोपाच्या प्रभावानें तर केव्हा सल्ला व धीर देण्यासाठी प्रत्यक्ष रणांगणावर हजर राहून, त्या वेळच्या बऱ्याच राजेराजवाडे व सरदारांना त्यांनी आपल्यांकडे आकृष्ट केले. इतक्या उच्च आध्यात्मिक अधिष्ठानावरून राजकारणास पारमार्थिक वळण लावणें हें या अवताराचें वैशिष्ट्य मानावें लागेल.

श्रीचिदंबर महास्वामींचें जीवन आध्यात्मिक जीवनाच्या उंचीचें निवेदन म्हणजे सनातन धर्माच्या चिरंतन तत्त्वपरिपाकाचा सुमधुर

परिमल सर्वत्र उधळणेंच होय. इतकें उन्नत आणि विशाल जीवन अन्यत्र पाहावयास मिळणें सुतरां दुर्मिळ आहे. याचा सर्वश्रेष्ठ पुरावा म्हणजे तत्कालीन शृंगेरी मठाधीश्वर श्रीशंकरभारती–स्वामी यांनीं मुक्तकंठानें महास्वामींचा प्रभाव गाइला आहे.

श्रीमद्गिरीशपादाब्जद्वंद्वसंततसेवया ।
संपादितमनःशुध्द्या सुसंप्राप्ताष्टसिद्विषु
।। ३ ।।

सौमिक्या दीक्षया त्वष्टमूर्त्युत्तशरीरताम् ।
स्पष्टं प्राप्तेषु लोकांनां परिपालनहेतवे
।। ४ ।।

मानवकुल महोन्नतपद पावून, परमात्मप्रेमास पात्र व्हावें, म्हणून त्यांनीं विश्वधर्माच्या तत्त्वांचा गाभाच भक्तांहातीं काढून दिला आहे. चिद्घन, चिदानंद- चिदंबर हे नित्य, निर्विकल्प, निरामय, निरालंब, आनंदस्वरूप असूनहि सहज लीलेस्तव त्यांनीं महामाया निर्मून सृष्टिकार्य हातीं घेतलें. या अखिल चराचर सृष्टींत मनुष्यप्राणी महादेवास अत्यंत प्रिय आहे. त्यांस पुनः भक्त दिसला कीं, त्याला प्रेमपान्हा फुटलाच. श्रीचिदंबरमहास्वामींच्या अनुग्रहानें धन्य झालेले अनेक भक्तशिरोमणी त्यांच्या दिव्य जीवनानें मोहित होऊन, त्यांच्या मुखकमलांतून अखंड स्त्रवणाऱ्या ज्ञानगंगेत मनसोक्त अवगाहन करून नवविधाभक्तीची रत्नमाला लेवून अध्यात्माच्या सार्वभौमपदीं विराजमान झाले आहेत.

या प्रकारच्या भक्तशिखामणींच्यामध्यें राजाराम व शिवशास्त्री यांची सूर्यचंद्राप्रमाणें शोभणारी तेजस्वी जोडी विसरून चालणार नाहीं. श्रीचिदंबरमहास्वामींनीं सांगितलेला धर्मसार त्यांनीं इतक्या बहारीनें विस्तारिला आहे कीं, तो वाचतांच साधकवृंद संतृप्त होऊन

स्वानंदपदीं समरसून जाईल यांत शंका नाहीं. राजारामानें तर 'माझे हृदयीं अवतारांचा सरदार श्रीचिदंबर देवाधिदेव प्रगटून माझे मुखें त्यानें एक लक्ष एकावन्नहजार चारशे एक्याण्णव अभंग वदविले आहेत व अनेक उद्ग्रंथ माझ्या हातून जगदुध्दाराकरितां रचविले आहेत,' असें डांगोरा पिटून सांगितलें आहे.

भगवान् भक्ताच्या आधीन असतो, सगुणरूप श्रीचिदम्बर यांचे दर्शनाची तळमळ लागून भक्तशिरोमणि राजाराम, स्वामींचे दर्शनास आल्यावेळीं स्वामींचे अंतःकरण प्रफुल्लित झालें, व ते स्वतः त्याला सामोरे जाऊन, त्याचा हात धरून त्यास आंत घेऊन गेले, प्रेमानें त्याला जवळ घेऊन, पाठीवरून हात फिरवून त्यांनीं लडिवाळपणानें त्याला कुरवाळिलें. कंठ सद्गदित होऊन तो प्रेमानें स्फुंदूं लागला. त्यांनें सद्गुरुचरणीं मस्तक ठेविलें आणि डोळे उघडून पाहतो तो समोर पीतांबरधारी चतुर्भुज, शंख, चक्र, गदा, पद्मयुक्त, वक्षःस्थलावर कौस्तुभाची प्रभावी झळकत असलेली माळा, अशी प्रशांत देदीप्यमान श्रीकृष्णमूर्ती उभी असलेली त्याला दिसली, आनंदाश्रु डोळ्यांतून वाहू लागले, सर्वांग पुलकित झालें. भक्त निजदेहमुख कमलांतून बाहेर पडलेल्या धर्मसाराचें विवेचन वाचकवृंदाच्या अवगाहनास्तव थोड्या विस्तारानें देत आहों.

श्रीचिदम्बरांनीं मागें कृष्णावतारीं श्रीमद्भगवद्गीतेंत उद्घोषित केलेला मौलिक मंत्रच आज पुनः सांगितला. प्रत्येकानी वेदोक्त स्वविहित कर्मे आचरावी हेच सनातन धर्माचे मर्म होय. वेदोक्त कर्माचरणानें चित्तशुध्दि होऊन मानवाची आध्यात्मिक जीवनाकडे प्रवृत्ती होते. विषयलालसेने बहिर्मुख होवून धावणारी इंद्रिये मनुष्य प्राण्यास विषयकूपांत लोटून देतात.

पण संसारदुःखानें जीव लवकरच होरपळून निघतो. व कासावीस होऊन, पश्चात्तापाच्या पावकानें पावन होऊन, आत्मोन्नतीच्या मार्गावर पावलें टाकू पाहतो. दुःखांच्या विपत्तींतून आध्यात्मिक जीवनसंपत्तीची उत्पत्ति होते. मायेचा बुरखा मागें सारून विवेकाची दिव्य दृष्टि देण्यास व साधकास आध्यात्माचे राजपथावर नीट पाय रोवून उभे राहण्याची शक्ति देण्यास सद्गुरुकृपा साहाय्यभूत होते. तेव्हांच म्हणावें कीं जीवात्म्याचा अखंड आध्यात्मजीवनक्रम सुरू झाला. श्रीसद्गुरुच्या दिव्य कृपेविना माणसाच्या जीवनांत असें अद्भुत परिवर्तन होणें दुरापास्त होय. मानवाला महोन्नत पदाप्रत नेण्यासाठी महादेवानें या संजीवनी विद्येचा गुप्त ठेवा महानुभावांच्या हाती दिलेला आहे. याप्रमाणे सद्गुरूकृपेने विवेकाचा उदय होऊन वैराग्य स्थिरावलें म्हणजे विषय वमनवत् वाटतात. अशा विशुध्द मनोभूमिकेंतच भक्तीचीं मुळें पक्कीं रुजतात, आणि म्हणून तर ही पवित्र भूमिका भक्ताला महत्प्रयासानें व जागरूकतेनें निर्मल राखावी लागते. श्रीगुरुदेवांच्या कृपेनें लाभलेल्या भगवंताच्या अधिकृत नामाच्या सतत स्मरणानें भक्तास एकेक दिव्य गुण आत्मसात् करून घ्यावा लागतो, प्रथम गुण म्हणजे **निरपेक्षता**–भक्तानें गुरुकृपेनें संपादिलेल्या साधन संपत्तीशिवाय अन्य कशाचीही त्यास अपेक्षा नसणें. यांत एका निमिषार्धाचाहि खंड पडला तरी तो परम व्याकुल होतो, त्याप्रमाणें निरपेक्षतेची परिणत पायरी चढून गेल्यावर मननशीलतेचा दुसरा दिव्य गुण हस्तगत करावा लागतो. मननशीलतेंमुळें नामाचें वेड लागतें. आत्मबल वाढीस लागतें. सद्गुरुकृपेनें व अभ्यासानें इतकें मिळविल्यानंतर भक्तास आत्मशांति अंकित

करून घेण्याकरितां भगीरथ प्रयत्न करावा लागतो. देहभाव मावळल्यानंतर निजात्मभावाचा उषःकाल होतो आणि मग अंतःकरणांत शांतिसूर्य उदय पावतो.

सद्‌गुरुच्या अनुग्रहानें निर्वैरत्व पदवी पावलेला भक्त सुखदुःख, लाभालाभ, जयापजय, मानापमान, शत्रुमित्र, या द्वंद्वाच्या पलीकडे जावून शांती सुधा सेवूं लागतो. मग दुसऱ्याचे गुणदोष त्यास कसे दिसतील! सकल प्राणिमात्रामध्यें समसमान व्यापलेल्या परमात्म्याच्या परम प्रीतीला पात्र होऊ पाहणाऱ्या भक्ताला याच्या पुढचा गुण, ज्याला **समदर्शन** म्हणतात, तो संपादन करावा लागतो. नित्याभ्यासानें भक्ताला वर खालीं, पुढें मागें, आंत बाहेर, सर्वत्र सर्वकाळीं स्वरूपदर्शन होऊन समदृष्टि लाभते, श्रीगुरुनाथाच्या कृपेनें निज खूण बाणतें. आत्मसूर्याचा उदय होतो. कमनीय कैवल्यमूर्तीचा लखलखाट होतो.

देह क्षणभंगुर आहे, काळसर्प केव्हां गिळंकृत करील याचा नेम नाहीं. मोहक विषयांचें विष पिऊन नरदेहरत्न गमावूं नको. दुःखमय संसाराचें यथार्थ स्वरूप समजल्यास पश्चात्ताप सहजीं होईल. मग अनुतापतीर्थी न्हालेल्या भक्तास वैराग्य वरेल. वैराग्यानें प्रेम, परमार्थप्रेमानें सद्‌गुरुसंशोधन, सद्‌गुरुपासून उपदेशग्रहण, भगवन्नामसाधनानें भक्तिप्रेमप्राप्ती, भक्तिप्रेमानें अखंड स्वानंदसेवन, अशी स्वानंदसोपानपरंपरा श्रीचिदम्बरमहास्वामींनी, दुःखार्णवांत गटांगळ्या खाणाऱ्या दीन जीवांच्या उध्दारार्थ, राजारामाच्या मिषानें दिली आहे. भक्तवरा, साक्षिभूत राहून सर्वकर्मे मदर्पण कर. मानव कुलांच्या उध्दाराचे महनीय कार्य सहजी होईल. भाविक साधक तरून जाण्यासाठीं मीं भक्ताहातीं नरदेहनौका दिली आहे. गुरुदेवांच्या

मुखकमलांतून आलेल्या श्रीहरीच्या अधिकृत नामाचीं वल्हीं मारून परतीर सुखरूपपणें गाठतां येईल. ज्ञान, भक्ति व कर्म यांचा त्रिवेणी संगम सुंदररीतीनें साधून समष्टिस्वरूपांत व्यष्टीची विविधता अविष्कृत करून, भक्तशिरोमणींच्या जगाने मिषानें बहाल केला, या दयाघन चिदम्बर मोक्षगुरूंचे उदंड उपकार कसे बरे फिटतील! धन्य धन्य राजाराम!! श्रीचिदम्बर महाराज की जय! जय!! जय!!

श्रीचिदम्बरमहास्वामींचा तर्कशुध्द तत्त्वज्ञानोपदेश जगांतील श्रेष्ठ तत्त्वज्ञान्यांनाही थक्क करून सोडणारा आहे असें निःशंकपणें म्हणता येईल. यज्ञयागांचे बाबतींत बाह्य अंगाना गौणत्व देऊन, दुष्प्रवृत्तींचा निरास व सत्प्रवृत्तीचा विकास हाच यज्ञांगाचा अर्थ जगाला उद्घोषून सांगितला आहे. त्यांनीं उपदिष्ट केलेलें यज्ञरूपक तर फारच बहारीचें आहे. यज्ञाला त्यांनीं साक्षात् श्रीविष्णू असें संबोधलें आहे, आणि **१ वैराग्य, २. निरभिमान, ३. तनुमानस, ४. निरहंकार, ५. सत्त्वापत्ति, ६. अद्वैतता, ७. तुरीयावस्था** या परतत्त्व मंदिराच्या सप्त सोपान श्रेणी होत असें प्रतिपादलें आहे. यज्ञाचे कायिक, वाचिक व मानसिक असें तीन प्रकार असून कायिक यज्ञांत देहाभिमान दवडावयाचा, वाचिक यज्ञांत भगवन्नामस्मरणानें वाक्शुध्दि साधावयाची आणि मानसिक यज्ञ कसा करावा याचाहि स्पष्ट व सुरस दिग्दर्शक केलें आहे तें असें—

वैराग्य दीक्षा घेवोनी । हृदयकुंडी पेटवा ज्ञानाग्नि।
ध्यानयूप सबळ रोवोनी । बांधा आणोनि मन पशूस ।। १ ।। विचारतंतूनें बांधावा । महावाक्यमंत्रें संस्कारावा । मग निरंजनशामित्रगृहा न्यावा । संहारावें साक्षिप्रकारें

।। २ ।। निर्ममत्व तीक्ष्ण शस्त्र घ्यावे हातां । पशूवरी न करितां ममता । छिन्नभिन्न करोनि मागुता । ज्ञानाग्नीमाजीं हवन करी ।। ३ ।।

चारी पुरुषार्थ साधण्यासाठी ज्या नैतिक गुणांची जरुरी असते त्या गुणांची प्रतिष्ठापना म्हणजेच यज्ञकल्पनेचा खरा अविष्कार. किती तर्कशुध्द भूमिका!

उडपी वैष्णव मठाधीश्वर श्रीभुवनेंद्रतीर्थ यांनीं श्रीमहास्वामींच्या अवताराबद्दल खात्री पटूनच पुढील उद्गार काढलेले आहेत.–

श्रीमध्दीरचिदंबरा तयशः श्रीसार्वभौमो भुवि ।
स्वैरं संविहरन् पुरंदरपुरे चाध्यास्य सिंहासनम्।।
संशोभित्रिदशानपीत्यनुदिनं वैकुंठलोकादिषु ।
प्रोच्चैर्दुन्दुभयो नदन्ति कमलानाथादिनुन्ना: किल ।।

श्रीचिदंबर महास्वामींच्या धर्मज्योतीच्या दिव्य प्रकाशांत राजारामाची ब्रम्हस्थिति निडारून त्यास जी प्रबोधनशक्तीची प्राप्ती झाली, त्यायोगें जडमूढांना उध्दरण्याकरितां, देशभर छातीशी सद्गुरूंचे पादत्राण कवटाळून तो अखंड फिरला यात काय आश्चर्य!

अशा अवतारी पुरुषांचें अवतारकार्य संपल्याबरोबर ते लागलीच अंतर्धान पावतात. श्रीचिदंबरमहास्वामींनीं आपला निर्याणकाल समीप आलेला पाहून आपला प्रिय शिष्य शिवशास्त्री यास जवळ बोलावून जो दिव्य संदेश दिला तो असा:–

"भावी समय दुर्घट आहे. अनीति थैमान घालील. कृत्रिमता वाढेल. परमार्थ सोडून अर्थाकडे जग झुकेल व तेर्णेकरून अनर्थपरंपरा ओढवेल. जनता धर्मविमुख होईल. स्वार्थभूतांचें तांडवनृत्य थाटून राहील. नामोच्चारण व सन्मार्गाचरण यांचें नांव निघतांच तिडीक भरून

डोकें उठेल. सात्त्विक वृत्तीचें हसें होईल. साधुसंतांचा छळ होऊं लागेल. फार काय, मदांधता, विषयलोलुपता आणि स्वैर वृत्ति ह्या बेसुमार बोकाळतील. तूर्त मी गुप्तरूपें वसतों. **मजवर श्रध्दा ठेवून माझें नामचिंतन जो करील त्याला मी त्रिकालीं अंतर देणार नाहीं हें लक्षांत ठेवा. माझ्या भक्तांना मीं मागे कधीं सोडलें नाहीं आणि पुढेंहि पण सोडणार नाहीं.** तुम्ही धीर चित्तानें धर्मवाट रक्षावी. यदृच्छालाभें संतुष्ट व्हावें. असें कांहीं काळ सत्कर्म करून राहिल्यास मी .पुनरपि अवतरून वेदमार्ग रक्षणी."

हा दिव्य संदेश आजच्या निराशमय व अंधकारपूर्ण जगात उज्वल प्रभा फाकवेल व बुडत्या जगाला तारील यांत तिळमात्र शंका नाही.

प्रस्तुतच्या विपरीत काळांत आम्हीहि लोकमान्य टिळकांच्याप्रमाणेंच श्रीचिदंबरमहास्वामींनीं देशप्रेम व धर्मप्रेम या गुणांचा भारतवर्षावर अखंड वर्षाव करून, भारताकरवी विश्वशांति स्थापण्यास बुध्दि व शक्ति द्यावी एवढीच प्रार्थना करतो.

लोकमान्यांचे उद्‌गार पाहा—"श्रीचिदंबर स्वामींचे वेळीं या क्षेत्रीं पेशव्यांच्या दरबाराचे मोठमोठे सरदार श्रींचे भेटीस येत असत. अशा या इतिहासप्रसिध्द गांवाचें महत्त्व उत्सवासारख्या मंगलप्रसंगीं देशकार्य करून कायम राखण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येक देशाभिमान्याचें कर्तव्य आहे— हें माझे श्रीचिदंबरेश्वराजवळ हात जोडून मागणें आहे ते ते पूर्ण करतीलच. लो. टिळक. (१९०७ साली गुर्लहोसूरास आल्यावेळीं)

प्रस्तुत ग्रंथ प्रासादिक आहे. ग्रंथकार श्रीसांबदीक्षित हेही एक अधिकारी पुरुष होऊन

गेले. यांच्या वडीलांचे नाव रामदीक्षित. लहानपणी बालग्रहाचा आजार झालेमुळे बैराग्याच्या सल्ल्यावरून, त्यांना मुरगोडास पाठविण्यात आले होते. साम्बदीक्षितांचा जन्म इ. स. १८५२ मध्ये मुरगोडास झाला. यानी विद्याभ्यास संपलेंवर केंगेरीस पाठशाळा काढली. बेळगांव जिल्हांतील हुदली या गावी रुद्रस्वाहाकार व धारवाड जिल्हांतील रोण येथे संहिता स्वाहाकार केला. ते मोठे संस्कृत पंडित होते. त्यांनीं संस्कृतांत श्रीचिदंबरचरित्र व लोकापूर माहात्म्य लिहिलें आहें. पुढें त्यांनीं सन्यांस घेतला व इ. स. १९०८ मध्यें त्यांनीं समाधिहि घेतली. त्यांनीं आपलें मरण एक महिना आधी सांगितलें होतें. अशा अधिकारी लेखकाच्या लेखणींतून हा ग्रंथ अवतरला आहे. आतां त्याला अवतरणिका अध्याय, सप्ताहरपारायणपध्दति आरत्या वगैरे जरूर वाटल्यानें, जोडण्यांत आल्या आहेत. अशा ग्रंथाचें पारायण सद्भावनेनें केल्यास निःसंशय फलदायी ठरेल.

ग्रंथाची छपाई अत्यंत सुबकपणे करून ग्रंथ सर्वांगसुंदर करण्याचे कामीं जमखंडी येथील हनुमान प्रेसचे गोविंद अनंत्त पोंक्षें यांनीं विशेष काळजीपूर्वक लक्ष घातलें याचा येथें साभार उल्लेख करणें जरूर वाटतें. तसेंच, ज्यांच्या तळमळीमुळें श्रीचिदंबरसेवासमिति अस्तित्वात आली त्या चिदंबरदीक्षित बडली यांचे, ज्यांच्या आशीर्वादानें हा ग्रंथ पुनर्मुद्रित झाला त्या परमहंस सदानंदस्वामी (ग्रंथकारांचे बंधु) यांचे, व या ग्रंथाचे सर्व मालकी हक्क समितीस दिल्याबद्दल, श्रीसांबदीक्षित यांचे सुपुत्र चिदंबरदीक्षित यांचें, येथें कृतज्ञतापूर्वक स्मरण केल्यावांचून राहवत नाही. तसेंच हें ग्रंथप्रकाशनाचें महत्त्वाचें कार्य पूर्ण करण्यास ज्या

गेले. यांच्या वडीलांचे नाव रामदीक्षित. लहानपणी बालग्रहाचा आजार झालेमुळे बैराग्याच्या सल्ल्यावरून, त्यांना मुरगोडास पाठविण्यात आले होते. साम्बदीक्षितांचा जन्म इ. स. १८५२ मध्ये मुरगोडास झाला. यानी विद्याभ्यास संपलेंवर केंगेरीस पाठशाळा काढली. बेळगांव जिल्हांतील हुदली या गावी रुद्रस्वाहाकार व धारवाड जिल्हांतील रोण येथे संहिता स्वाहाकार केला. ते मोठे संस्कृत पंडित होते. त्यांनीं संस्कृतांत श्रीचिदंबरचरित्र व लोकापूर माहात्म्य लिहिलें आहें. पुढें त्यांनीं सन्यांस घेतला व इ. स. १९०८ मध्यें त्यांनीं समाधिहि घेतली. त्यांनीं आपलें मरण एक महिना आधी सांगितलें होतें. अशा अधिकारी लेखकाच्या लेखणींतून हा ग्रंथ अवतरला आहे. आतां त्याला अवतरणिका अध्याय, सप्ताहरपारायणपध्दति आरत्या वगैरे जरूर वाटल्यानें, जोडण्यांत आल्या आहेत. अशा ग्रंथाचें पारायण सद्भावनेनें केल्यास निःसंशय फलदायी ठरेल.

ग्रंथाची छपाई अत्यंत सुबकपणे करून ग्रंथ सर्वांगसुंदर करण्याचे कामीं जमखंडी येथील हनुमान प्रेसचे गोविंद अनंत्त पोंक्षे यांनीं विशेष काळजीपूर्वक लक्ष घातलें याचा येथें साभार उल्लेख करणें जरूर वाटतें. तसेंच, ज्यांच्या तळमळीमुळें श्रीचिदंबरसेवासमिति अस्तित्वात आली त्या चिदंबरदीक्षित बडली यांचे, ज्यांच्या आशीर्वादानें हा ग्रंथ पुनर्मुद्रित झाला त्या परमहंस सदानंदस्वामी (ग्रंथकारांचे बंधु) यांचे, व या ग्रंथाचे सर्व मालकी हक्क समितीस दिल्याबद्दल, श्रीसांबदीक्षित यांचे सुपुत्र चिदंबरदीक्षित यांचें, येथें कृतज्ञतापूर्वक स्मरण केल्यावांचून राहवत नाही. तसेंच हें ग्रंथप्रकाशनाचें महत्त्वाचें कार्य पूर्ण करण्यास ज्या

